# ॥ शुभ दिपावली ॥

Netअक्षरी

दिवाळी विशेषांक

मंतरलेली प्रभा नवी अन
मंतरलेले दिवस नवे...
कंदिल खुणवी चांदोबाला
दारोदारी नवलक्ष दिवे...



संपादिका
सोनाली घाटपांडे (पुणे)

अतिथी संपादक
अनुजा मुळ्ये (पुणे), आकाश बिरारी (लंडन)

सह संपादक
भारती सरमळकर (मुंबई), स्वप्ना कोल्हे (नाशिक), सचिन काकडे (मुंबई)

नेटाक्षरीच्या सर्व रसिक वाचकांना दिपावलीच्या हार्दिक शुभेच्छा



लखलखा चंदेरी तेजाची न्यारी दुनिया

झळाळती कोटी ज्योती ह्या ।।

यात दिवाळीच सही-सही वर्णन केलय असं कायम मला वाटतं .

दिपोत्सवाचे वातावरणचं तसे तेजस्वी असते.

दिवे, आकाशदिव्यांचा प्रकाश, पणत्या, रांगोळी, अभ्यंगस्नान,

फराळाचा सुवास, नविन कपडे ह्या सगळ्याची नवलाई

आणि अप्रूप तर वेगळच.

या सगळ्याबरोबर ई-साहित्य प्रतिष्ठान घेऊन आलय

दिवाळी विशेषांक, ज्यात आहेत दिवाळीच्या फराळासारख्या

वेगवेगळ्या चवीच्या कविता खास आपल्यासाठी !!

दिवाळीच्या आनंदात आपल्या सोबत आपल्या

सुहृदांनाही सामिल करून घेऊया !!

एक दिप उजळावा

सर्वांच्या घरात ।

दिप सौख्याचा, प्रेमाचा

आणि विश्वासाचा ।।



दिपावलीच्या हार्दीक शुभेच्छा !!

## ....शिक माणसा....

अस्त होतो जीवनाचा
आकांक्षांचा मुळीच नाही
उघडे पडते पितळ खोटयाचे
परि सत्याला मरण नाही

हसरा चेहरा सनद यशाची
चिंता काळजाला जाळी
श्रध्देतून विश्वास उपजतो
कार्यसिध्दीची मिळते थाळी

संततधार पडता अश्मावरी
दगडाच्या ठिकऱ्या उडती
रामनाम धारोधार घेता
परममोक्षाची दारे उघडती

असत्य असते अपंग सर्वदा
आधाराविण ते उभे न राही
ताठ मान अन कणा सत्याचा
तेच अम्हा आधार देत राही

जरी चुरगळली फुले पायदळी
तरीही देती सुगंध पदाला
शिक माणसा कुसुमाकडून तू
म्हणती जगी या क्षमा कशाला

**- अरविंद चौधरी ,जळगाव**

# ....जागलं पाहिजे....

आता कंटाळा खुप झाला
कामाला लागलं पाहिजे
स्वप्नांच्या पूर्तीसाठी
आता जागलं पाहिजे

मला जमत नाही म्हणून
आता चिडायचं नाही
माझं कसं होईल असं
म्हणत कुढायचं नाही

कमकुवत शब्दांना
पुरुन टाकलं पाहिजे
स्वप्नांच्या पूर्तीसाठी
आता जागलं पाहिजे

येत नाही तिथे तिथे
प्रयत्न करीन म्हणायचं
सर्व अडचणींना
अगदी पुरुन उरायचं

दुर्दम्य आशावाद
घेऊन जगलं पाहिजे
स्वप्नांच्या पूर्तीसाठी
आता जागलं पाहिजे

**- तुषार जोशी, नागपूर**



# ....नवे शस्त्र....

या क्षणाचे सत्य असेल ;असेल
प्रत्येक क्षण तोच तसाच असेल नसेल
तू तुझा असशील वा जगाचा
जगाला सोयर सुतक कसले असेल नसेल

पण कर तुझ्या हाती आहे ते सारे
जिद्द सारी बनेल सुसाट शीड वारे
सुटेल गलबत धारदार वादळाला चिरुन
उघडतील सटासट बघ खिडक्या दारे

नवीन वर्ष नवीन दिवस नवा क्षण
पडेल तुझ्या ताकदीवर अंतीम घण
सोस सोस हो चिपाड पण संपू नकोस
वाट बघतंय तुझ्यासाठी नवीन रण

नवीन कंदन नवीन शस्त्रे नवीन श्वास
नवाच तुझ्या हातासमोर आलाय घास
लपक झपक हो तयार मुठ वळून
दाखव तुझ्या आतला आतला दृढ विश्वास

चल ,जग जिंकायचंय अजून !



**- नाम गुम जायेगा**

## ....असायचंच तर....

असायचंच तर ध्रुवासारखं असावं

झालेला अपमान नाकारुन

जे हक्काचं ते मिळवून दाखवावं

पाठपुरावा एकलव्यासारखा करावा

एकदा गुरु मानल्यावर प्रत्यक्ष न मिळेल

तर स्वबळावर मिळवूनही गुरुऋण चुकतं करावं

ज्ञान घुबडासारखं मिळवावं

जितकं जास्त पाहू ,तितकं कमी बोलावं

जितकं कमी बोलणं ,तितकं जास्तच ऐकावं

जे चुकलं ते मान्य करावं

सुधारित मार्गाने निर्भीड निघावं

अंतिम क्षणी मुखावर स्मितच तेवढं विलसावं

**- प्रभा प्रभुदेसाई ,आसाम**

# ....मला एक नवीन क्षितीज सापडलंय....

मला एक नवीन क्षितीज सापडलंय

होय,

जिथं सूर्य कधी मावळतच नाही
अन काळोखाला अस्तित्वच नाही
जिथं भूतकाळाचं वास्तव्यच नाही
अन आठवणींचा प्रश्नच येत नाही
होय मला एक नवीन क्षितीज सापडलंय

जिथं सुख सोबत सोडत नाही
अन दुःख कुठंच दिसत नाही
जिथं प्रेमाला सीमाच नाही
अन मत्सराला थाराच नाही
होय मला एक नवीन क्षितीज सापडलंय

जिथं आपल्या भावनांना कदर आहे
होरपळलेल्या मनाला मायेचा पदर आहे
जिथली नाती बंधनातीत नाहीत
तरीसुध्दा अजून ती सांडलेली नाहीत
होय मला एक नवीन क्षितीज सापडलंय

जिथं मला कुणाचीच भिती नाही
अस्तित्व सांगणारी स्वतःची सावलीसुध्दा नाही
जिथं कोणताच ऋतू मला लागू नाही
अन ऊन पावसाचे खेळ माझ्या जीवनातच नाही
होय मला एक नवीन क्षितीज सापडलंय

जिथं वाटासुध्दा दुहेरी नाहीत
फक्त पुढं चालायचं माघार मात्र नाही
जिथं प्रश्नचिन्ह कुठच दिसत नाही
उत्तर मिळेपर्यंत प्रश्नच उरत नाही
होय मला एक नवीन क्षितीज सापडलंय



**- संदीप शेलार,सातारा**

# आयुष्या ! मी आले रे

दार उघडून बाहेर आले
किती मोठ्ठे आकाश
डोळ्यांना दिपवून जातो
लख्खख सूर्यप्रकाश

बोचरा वारा आहे
निसरडा किनारा आहे
पण मन तयार झालंय
बिनधास्त व्हायचं ठरलंय

आयुष्या ! मी आले रे
खंबीर कणखर झाले रे

- **तेजस्विनी भालेराव, मुंबई**



# पाऊस तुझ्यासाठी

तुला पाहण्या ढ़गातल्या ढगात
किती तरसला पाऊस
तू दिसताच मग
वेडावून ,मनसोक्त बरसला पाऊस

केसातून निसटून हळूच जेव्हा
गालांवर रेंगाळला ,
आलो कुठून , जायचे कुठे?
सारे विसरला पाऊस

तुझ्या गजरयाच्या सुगंधात
आधी चिंब चिंब भिजला
अन ,दूर दूर मृद्‌गंध निथळत
मग पसरला पाऊस

ओठांना बिलगला कधी , कधी
डोळ्यात खोल बुडला
कधी झिंगला खळीत अन कधी
ख़ाली घसरला पाऊस

पाऊले तुझी अवचीत वळली

तुझ्या घराकडे जेव्हा

तेव्हा वाटेवर माझ्या

हिरमुसून मग ओसरला पाऊस

**नीरज आडे**

# काफ़िला

वारुळी मुंग्यांचा

देऊळी भक्तांचा

काफ़िला .......!!

नभात पक्षांचा

रानात वृक्षांचा

घरात नात्यांचा

काफ़िला .......!!

रातीत कैफाचा

श्वासात लयीचा

गात्रात तृप्तीचा

काफ़िला .......!!

मनी आठवांचा

नेत्री आसवांचा

तनी शहा-यांचा

काफ़िला .......!!



**सुप्रिया**

## बिन फ़टाक्यांची दिवाळी

बिन फ़टाक्यांची अजून एक दिवाळी
खात्यामध्ये खडखडाट
तरी दारामध्ये दणदणाट
ईन्व्हर्टरच्या वीजेचा
गल्लोगल्ली लखलखाट
झगमगाट दणदणाट
आनंद साजरा करण हेच का?
अरे कानाचे पडदे फ़ाडण
ह्यात कसला आलाय आनंद??
हा कोणता सण?
पणत्यांच्या माळांचा सण हा
रोषणाईचा नव्हे
उत्साहाचा फ़राळाचा सण हा
आतषबाजीचा नव्हे

दरवर्षी वाटत
चार दिवस फ़िरायला जाव...
कोलाहलापासून दूर राहाव...
पण...
माझही घर झगमगत
अन मला अडवून ठेवत...

बिन फ़टाक्यांची अजून एक
दिवाळी मी साजरी करतो
आणि चार दिवस ऑफ़िस नाही
याच आनंदात डुंबतो...।

**रणजित पराडकर (रसप)**

## ।। आली दिपावली।।



आली आली दिपावली, मौज वाटे भारी ।

उजळूनी निघतील, दिशा चारी चारी ।। १।।

काना-कोपरे घराचे, छानसे सजवू ।

पाना-फुलांची तोरण, दारावरी लावू ।।२।।

सारे मिळूनिया करु, किल्ला शिवनेरी ।

रंगी बेरंगी चित्रही, मांडू किल्ल्यावरी ।।३।।

झिरमिळ्या बनवू, आकाश कंदिल।

उंच उंच झाडावरी, दादा तो बांधिल।।४।।

मित्र मैत्रिणीं धाडू शुभेच्छांची पत्र ।

पाहुनी तो होइल हो आनंद सर्वत्र ।।५।।

पणत्यांची ज्योत देई ,मंगल संदेश ।

सुख-समृद्धीचा होवो, जीवनी प्रवेश ।।६।।

आई ताई काढतील, अंगणी रांगोळी ।

तेल, उट्णे लावूनी , करु या आंघोळ ।।७।।





नव्या नव्या कपड्यांचा, होई थाटमाट ।

गोड - धोड फ़राळाचे, येई पुढे ताट ।।८।।

नको नको आवाजाच्या, फ़टाक्यांच्या लडी ।

कानामध्ये बसेल हो ,कायमची दडी ।।९।।

देवापुढे आई मांडे मोठ्ठ अन्नकोट ।

पण तेव्हढ्याने कसे, भरे त्याचे पोट? ।।१०।।

म्हणूनीच प्रश्न पडे , माझ्या मना जरा ।

अनाथ, हा सण कसा, करिती साजरा ।।११।।

अनाथांची कशी बरे, असते दिवाळी ? ।

लखलख प्रकाश का, आहे त्यांच्या भाळी ।।१२।।

सामावूनी घेवू त्यांना, सा-या आनंदात ।

प्रकाशाच्या वाटा येवो, त्यांच्या जीवनात ।।१३।।

दिप खुशीचे दिसता ,त्यांच्या मुखवरी ।

देवालाही आवडेल, तेच खरोखरी ।।१४।।



**उपेन्द्र चिंचोरे**



# मैत्रिण

मैत्रिण भेटायची
नंतर कोसळत रहायची
मैत्रिण कवेत घ्यायची
चिंब करायची

मैत्रिण घेऊन जायची ढगात
तरंगत , उडत अगदी अलगद
कधी झांडांना स्पर्श करत
तर कधी वेलींशी बिलगत

कधी शांत व्हायची
पडत राहायची रिमझींम

मैत्रिण यायची
मी उधाणलेला असताना
मैत्रिण द्यायची दिलासा
टाकायची उसासा



म्हणायची "याचा नाही भरवसा...!'

मी कधी भिजून घ्यायचो

कधी ओंजळीत धरायचो

विचारायचो " तुझा आहे?"

कुठे असशिल?

कशी असशिल?

कधी येशिल?

की नाही येणार ?

हवेत, कवेत, झाडात,ढगात, वेलीत , ओंजळीत

मग ती छान हसायची ...!

पुन्हा पावसाची सर बनून

जायची भुरु भुरु उडून

तळहात ओले अन मन रिते करुन

**विनायक उजळंबे**

# शारदाची रात

ओळखीची बात आहे
शारदाची रात आहे

सांज येता पेटले रे
तू दिवा मी वात आहे

शोधिसी काळोख़ का रे
चांदण्यांची मात आहे

स्वप्न सारी टांगणीला
आज हाती हात आहे

या सुरांना सूर शोधी
प्रेम गाणे ग़ात आहे

यौवनाला बाज आला
टाकली मी कात आहे

कोरडासा चांदवा हवा
चांदणी मी न्हात आहे

चाखली कोजागिरी तू
आज मी कैफ़ात आहे



**मनिषा**

